जागतिक बँक सहाय्यित " मानवी विकासासाठी उपयोजित ज्ञान आणि कौशल्याचा विकास"- (दक्ष) या राज्य प्रकल्पाकरिता, प्रकल्प कालावधीसाठी १ पदसिद्ध प्रकल्प संचालक पदास तसेच ७ प्रतिनियुक्तीने व ३८ बाह्यस्त्रोताद्वारे असे एकूण ४५ (७+३८) मनुष्यबळ उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देण्याबाबत......

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार ,उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : जाबॅप्र-२०२४ / प्र.क्र.२०/ व्यशि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०६ जून, २०२५

**वाचा:-**

१. सा.प्र.वि.,शा.नि. क्रमांक : एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/कार्यासन-१२,दि. १७ डिसेंबर,२०१६
२. सा.प्र.वि.,शा.नि. क्रमांक : संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्यासन -१४, दि.३१ ऑगस्ट, २०१७
३. सा.प्र.वि.,शा.नि. क्रमांक : एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्यासन -१२, दि.१६ फेब्रुवारी, २०१८
४. वित्त विभाग, शासन निर्णय: क्रमांक पदनि-२०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क.,दिनांक २७ एप्रिल, २०२२
५. सा.प्र.वि.,शा.नि. क्रमांक : संकीर्ण-२७१५/प्र.क्र.१००(भाग-१)/१३, दि.८ सप्टेंबर, २०२३
६. D.I.T., G.R.No:GAD-IT 080/4/ 2014-O/O -DIT (MH), ०५/१०/२०२३
७. कौ.रो.उ.व ना. विभाग,शा.नि., प्र.क्र.जाबॅप्र- २०२३/प्र.क्र.०६/व्यशि-४,दि.१८ डिसेंबर, २०२३
८. वित्त विभागाच्या उपसमितीच्या बैठकीचे इतिवृत्त, दि. २१ मार्च २०२५.
९. वित्त विभागाच्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीचे इतिवृत्त,दि. १३ मे २०२५.

**प्रस्तावना:-**

राज्यातील व्यावसायिक शिक्षण, नाविन्यता व कौशल्य वृद्धी विषयक योजनांची अंमलबजावणी आणि त्यासाठीच्या आवश्यक गुणवत्तापूर्ण पायाभूत सुविधा व कार्यप्रणालींचा विकास आणि त्यांच्या बळकटीकरणाकरिता जागतिक बँक सहाय्यित " मानवी विकासासाठी उपयोजित ज्ञान आणि कौशल्याचा विकास"- (दक्ष) प्रकल्प (Development of Applied Knowledge and Skills for Human Development- DAKSH Project) राबविण्यास सं.क्र. ७ वरील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. या शासन निर्णयातील मु.क्र. ४ नुसार उच्चाधिकार समितीच्या मान्यतेने Project Management Unit मध्ये सदर प्रकल्प कालावधीकरिता प्रतिनियुक्तीवरील पदे निर्माण करण्यास तसेच आवश्यक कालावधीसाठी बाह्यस्त्रोताद्वारे आवश्यक ते मनुष्यबळ भरण्यास मान्यता मिळालेली आहे. त्यास अनुसरुन दक्ष प्रकल्पाचा आराखडा तयार करणे, प्रकल्प अंमलबजावणी व संनियंत्रणासाठी, प्रकल्प कालावधीकरिता प्रतिनियुक्तीने व बाह्यस्त्रोतामार्फत मनुष्यबळ उपलब्ध करुन घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जागतिक बँक सहाय्यित " मानवी विकासासाठी उपयोजित ज्ञान आणि कौशल्याचा विकास"- (दक्ष) या राज्य प्रकल्पाकरिता, प्रकल्प कालावधीसाठी प्रकल्प आराखडा तयार करणे, प्रकल्प अंमलबजावणी व संनियंत्रणासाठी १ पदसिद्ध प्रकल्प संचालक पदास तसेच ७ प्रतिनियुक्तीने व ३८ बाह्यस्रोताद्वारे असे एकूण ४५ (७+३८) मनुष्यबळ उपलब्ध करुन घेण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. "दक्ष" प्रकल्पांतर्गत स्थापित प्रकल्प व्यवस्थापन कक्षातील प्रतिनियुक्तीवरील पदांचा तपशील यासोबत जोडलेल्या विवरणपत्र "अ" तसेच बाह्यस्रोताद्वारे उपलब्ध मनुष्यबळाचा तपशील विवरणपत्र "ब" नुसार राहिल.

३. "दक्ष प्रकल्प" रु. २३०७ कोटी रक्कमेचा असून, सदर प्रकल्प किंमतीच्या ७०% (अंदाजित रु.१६१५ कोटी) निधी जागतिक बँकेच्या कर्जाद्वारे व उर्वरित ३०% (अंदाजित रु.६९२ कोटी) निधी राज्य शासनाकडून उपलब्ध करून देण्यात येणार आहे. दक्ष प्रकल्पाचा कालावधी ५ वर्षे (दि.०१/०४/२०२४ ते दि.३१/०३/२०२९) इतका असून उच्च स्तरीय सचिव समितीच्या मान्यतेने भरण्यात येणारी अस्थायी पदे (प्रतिनियुक्तीवरील पदे + बाह्यस्रोतामार्फत घेण्यात येणारे मनुष्यबळ) प्रकल्प कालावधीपुरतीच मर्यादित राहतील. प्रकल्प कालावधी संपुष्टात आल्यानंतर सदर अस्थायी पदे आपोआप (प्रतिनियुक्ती व बाह्यस्रोताद्वारे उपलब्ध मनुष्यबळ) निरसित होतील. बाह्यस्रोताद्वारे घेण्यात येणाऱ्या मनुष्यबळाचा शासकीय सेवेत कोणत्याही परिस्थितीत समावेश होणार नाही याबाबत प्रकल्प संचालकांनी संबंधितांशी करारनामा करतेवेळी योग्य ती खबरदारी घ्यावी व भविष्यात त्यांचे शासनावर कोणतेही दायित्व निर्माण होणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. दक्ष प्रकल्पांतर्गत प्रतिनियुक्तीवरील पदे भरताना सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयातील तरतुदींचे पालन करावे तसेच बाह्ययंत्रणेद्वारे उपलब्ध मनुष्यबळाचे ठोक मानधन देणे व इतर बाबींच्या अनुषंगाने वित्त विभागाच्या शासन निर्णयांतील तरतुदींचे पालन करावे.

५. दक्ष प्रकल्प व्यवस्थापन कक्षांतर्गत मंजूर सर्व पदांच्या वेतन व मानधनावरील खर्च मागणी क्रमांक झेडए-२, २२३०, कामगार व सेवायोजन व कौशल्य विकास, ०२, सेवायोजन, सेवा,००१, संचालन व प्रशासन, (०१) सेवायोजन संचालक, (०१) (१७) जाबॅप्र "मानवी विकासासाठी उपयोजित ज्ञान आणि कौशल्याचा विकास (दक्ष) प्रकल्प, (कार्यक्रम) लेखाशीर्ष २२३०A८४४ (राज्य हिस्सा) या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या अर्थसंकल्पिय तरतुदीमधून भागवावा.

६. सदर शासन निर्णय मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय सचिव समितीने दिनांक - १३ मे २०२५ रोजीच्या बैठकीतील इतिवृत्तानुसार तसेच वित्त विभाग, अनौ. सं. क्र.१५२ / सेवा-९,

दि.०२.०६.२०२५ व अनौपचारीक सं.क्र.३६ / आ.पु.क.२५, दि.०६.०२.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६०६१२०३३७५००३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUSHAMA VIDYADHAR PARAB PUJARE

Digitally signed by SUSHAMA VIDYADHAR PARAB PUJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILLS EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=7812be5c0d4f8a856a28d230ddc860720f8fb1922a0f420dbd187879e1ca1e3d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=74630826A777989812A70B6342FAC34458CEB69B6D9F5B59539FDBA0A89E6173, cn=SUSHAMA VIDYADHAR PARAB PUJARE
Date: 2025.06.06 13:28:15 +05'30'

**( सुषमा परब-पुजारे )**

**उप सचिव तथा विशेष कार्य अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल महोदयांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२) मा. सभापती / उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

३) मा. अध्यक्ष / उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

४) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद, मुंबई.

५) मा. मुख्यमंत्री महोदयांचे अ.मु.स., मंत्रालय, मुंबई.

६) मा. उपमुख्यमंत्री (वित्त)/ (नगर विकास) महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

७) मा. मंत्री, कौ.रो.उ.व ना. यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

८) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई

९) महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई.

१०) महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र- २, नागपूर.

११) अधिदान व लेखाधिकारी/ निवासी लेखापरिक्षण अधिकारी मुंबई / ठाणे.

१२) दक्ष प्रकल्प संचालक तथा आयुक्त, कौ.वि.रो.व उ. आयुक्तालय, कोकण भवन, नवी मुंबई.

१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई.

१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, मुंबई.

१५) कुलगुरु, रतन टाटा महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, मुंबई.

१६) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१७) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य कौशल्य, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण मंडळ, मुंबई.

१८) निवडनस्ती/व्यशि-४.

## विवरणपत्र-“अ”

**प्रकल्प व्यवस्थापन कक्षामध्ये प्रतिनियुक्तीने भरावयाची पदे.**

| अ.क्र. | पदनाम व संवर्ग | वेतनश्रेणी (शासन अधिसूचना ३०.०१.२०१९) | प्रतिनियुक्तीचे मंजूर पद |
|---|---|---|---|
| १ | अतिरिक्त प्रकल्प संचालक | संवर्ग - भारतीय प्रशासन सेवा | १ |
| २ | प्रकल्प उप संचालक | एस-२३ :- रु.६७७००-२०८७०० | १ |
| ३ | मुख्य अभियंता (स्थापत्य) | एस-२९ :- रु.१३११००-२१६६०० / सेवानिवृत्त- सा.प्र.वि. शा. नि.,दि.१७/१२/२०१६, दि.२१/०२/२०१८ व दि. ८/०९/२०२३ * | १ |
| ४ | उप संचालक (वित्त व लेखा) | एस-२३ :- रु.६७७००-२०८७०० | १ |
| ५ | लेखाधिकारी | एस-१६ :- रु.४४९००-१४२४०० | १ |
| ६ | कार्यालयीन अधीक्षक | एस-१४ :- रु.३८६००-१२२८०० | १ |
| ७ | सहायक अधीक्षक | एस-१३ :- रु.३५४००-११२४०० | १ |
| **एकूण** | | | ७ |

* **टिप** :- अ.क्र. ३ येथील पद प्रतिनियुक्तीने/सेवानिवृत्ती भरती प्रकियेद्वारे उपलब्ध न झाल्यास बाह्यस्त्रोताद्वारे भरण्यात येईल.

## विवरणपत्र-“ब”

### प्रकल्प व्यवस्थापन कक्षामध्ये बाह्यस्त्रोताद्वारे भरावयाचे मनुष्यबळ

| अ.क्र. | पदनाम व संवर्ग | बाह्यस्त्रोताद्वारे मंजूर मनुष्यबळ | ठोक मासिक मानधन (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | प्रकल्प प्रमुख सल्लागार | १ | २,००,०००/- |
| २ | प्रकल्प विशेषज्ञ (आयटी व एम.आय.एस.) | १ | १,५०,०००/- |
| ३ | प्रकल्प विशेषज्ञ (प्रशिक्षण व मूल्यांकन) | १ | १,५०,०००/- |
| ४ | प्रकल्प विशेषज्ञ-उद्योजकता आणि स्टार्टअप | १ | १,५०,०००/- |
| ५ | प्रकल्प विशेषज्ञ मूल्यमापन व सनियंत्रण | १ | १,५०,०००/- |
| ६ | प्रकल्प विशेषज्ञ-उद्योग संबंध, प्लेसमेंट, ओजेटी आणि प्रशिक्षणार्थी | १ | १,५०,०००/- |
| ७ | प्रकल्प सामाजिक विकास आणि जेंडर विशेषज्ञ | १ | १,५०,०००/- |
| ८ | प्रकल्प पर्यावरण विशेषज्ञ | १ | १,५०,०००/- |
| ९ | प्रकल्प विशेषज्ञ-स्थापत्य कामे | १ | १,५०,०००/- |
| १० | प्रकल्प विशेषज्ञ वास्तुविशारद | १ | १,५०,०००/- |
| ११ | प्रकल्प विशेषज्ञ (खरेदी) | १ | १,५०,०००/- |
| १२ | प्रकल्प विशेषज्ञ माहिती शिक्षण व संवाद | १ | १,५०,०००/- |
| १३ | विधि अधिकारी | १ | १,५०,०००/- |
| १४ | प्रकल्प विशेषज्ञ वित्त | १ | १,५०,०००/- |
| १५ | कार्यालयीन सहायक | ११ | ४०,०००/- |
| १६ | लेखापाल | २ | ४०,०००/- |
| १७ | लिपिक | ४ | ४०,०००/- |
| १८ | लघुलेखक | २ | ४०,०००/- |
| १९ | शिपाई / मेसेंजर | ५ | २५,०००/- |
| **एकूण** | | **३८** | |